**राज्यस्तरीय सेतु महाराष्ट्र सोसायटीकडून तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन दिल्यानंतर संबंधित विभागाकडून १०% देखभाल व प्रशासकीय खर्च आकारण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

शासन परिपत्रक क्रमांक : मातंसं-२०१०/प्र.क्र.१४२/सेतु/३९,
सामान्य प्रशासन विभाग,
सातवा मजला,मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ ऑक्टोबर २०१०

**प्रस्तावना**

राज्यात ई-गव्हर्नन्सचे विविध प्रकल्प तसेच केंद्र शासनाने निर्देशित केलेले विविध मिशनमोड प्रकल्प राबविण्यासाठी तसेच विविध विभागांच्या संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्यासाठी नोडल संस्था म्हणून राज्यस्तरीय सेतु महाराष्ट्र सोसायटी ही सन २००३ मध्ये स्थापन करण्यात आली आहे. ई-गव्हर्नन्सचे विविध प्रकल्प राबविण्यासाठी विविध विभागांतर्गत संगणक प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळाचा अभाव हा.महत्वाचा अडसर ठरत होता. ही उणीव दूर करण्यासाठी सेतु महाराष्ट सोसायटीकडून तात्पुरत्या स्वरुपात आवश्यक ते मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यासाठी खाजगी संस्थांकडून निविदा मागवून करार करण्यात येतो. विविध विभागांना मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे व त्या विभागांकडून आलेल्या रक्कमांचे कराराप्रमाणे त्या त्या संस्थांना अदायीकीकरण करणे या कामाच्या देखभाल व त्या अनुषंगिक कामाकरीता प्रशासकीय खर्च लागु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन परिपत्रक**

राज्यस्तरीय सेतु महाराष्ट्र सोसायटीकडून विविध विभागांच्या संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्यासाठी त्या विभागांना तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात येते. सेतु महाराष्ट्र सोसायटीव्दारे विविध विभागांकरीता केल्या जाणाऱ्या संगणकीकरणाच्या प्रकल्पाकरीता संबंधित विभागांनी त्यांना पुरविण्यात येणाऱ्या तांत्रिक मनुष्यबळाच्या देय रक्कमेवर आधारीत त्या रक्कमेसोबत जादा १०% रक्कम ही देखभाल व प्रशासकीय खर्च म्हणून सेतु महाराष्ट्र सोसायटीकडे भरणा करावयाची आहे.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासन www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१०२६१५४१२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

७

**( विजयालक्ष्मी बिदरी प्रसन्ना )**
**सदस्य सचिव व संचालक (मा तं)**

**प्रत सादर**
राज्यपाल यांचे सचिव,

Golatkar.~tsD:/36

मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
शासनाचे सर्व अ.मु.स./प्र.स./सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी

प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी रवाना,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग/व्यय - ४, मंत्रालय, मुंबई,
लेखा शाखा/मातंसं,
निवड नस्ती, मातंसं.